ओवळे खारभूमी योजना ता. व जि. ठाणे, या योजनेच्या नुतनीकरण करणेच्या कामास प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणे बाबत.

महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः खाभूयो - २०२२/(प्र.क्र.१५६)/खारभूमी**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ०७ मार्च, २०२४

पहावे-

१. महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांकः खाभूयो - २०२१/(प्र.क्र.१२०)/खारभूमी दिनांक ११/१०/२०२१
२. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,कोंकण प्रदेश,मुंबई यांचे पत्र क्र./ मुअकोप्र / खाभूयो - ओवळे /तां -३ /४४००, दिनांक १४/११/२०२२ चे पत्र.

प्रस्तावना:-

ओवळे खारभूमी योजना ता. व जि. ठाणे, ही बोर्डकालीन योजना आहे. योजनेची एकूण लांबी २९०० मीटर आहे. ही योजना मुख्य समुद्रालगत आहे. सदर योजनेचे पुनः प्रापित क्षेत्र १९१ हेक्टर इतके आहे. योजनांच्या नुतनीकरणाची कामे सन १९९० मध्ये पूर्ण करण्यांत आली होती. योजनेच्या लाभक्षेत्रात मोघरपाडा व ओवळे या गावांचा समावेश आहे. अतिवृष्टी व उधाणामुळे या योजनेला मोठमोठ्या खांडी जाऊन शेतीचे नुकसान झालेले होते. त्याचप्रमाणे नेहमीच्या भरती ओहोटी मुळे व दरवर्षी होणा-या अतिवृष्टीमुळे बांधाचे अधिक नुकसान झालेले आहे.

ओवळे खारभूमी योजना ता. व जि. ठाणे या योजनेचे नुतनीकरण अंदाजपत्रक तयार करून प्रशासकीय मान्यतेसाठी सादर करण्यांत आले होते. सदर ओवळे खारभूमी योजनेच्या नुतनीकरण अंदाजपत्रकास "महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक खाभूयो-२०२१/( प्र.क्र. १२०) /खारभूमी, मंत्रालय, मुंबई दि. ११/१०/२०२१ अन्वये रू. २,३३,४२,९३१/- रक्कमेस प्रशासकीय मान्यता प्राप्त झाली आहे. तथापि मुळ प्रशासकिय मान्यता अंदाजपत्रक हे खारभूमी दरसुची सन २०१९-२० व प्रादेशीक विभागाची सन २०१९-२० च्या दरसूचीवर आधारित असुन सदर अंदाजपत्रक शासनास सन २०२१ मध्ये सादर करण्यात आले होते व त्यास ऑक्टोबर-२०२१ मध्ये प्रशासकीय मान्यता मिळाली असुन मार्च २०२२ मध्ये लाक्षणिक अनुदान प्राप्त झाले आहे. तथापी शासन निर्णय क्र निविदा०४१७/( प्र.क्र. २४७/१७)/मो.प्र.१ दि ३० नोव्हेंबर २०१८ मध्ये नमुद मुद्दा क्र.१.२ अन्वये निविदा कार्यवाही हाती घेण्यापुर्वी प्रस्तावित कामाचे अंदाजपत्रक प्रथम चालू दरसूचीने अद्यावत करावे व अंदाजपत्रकास सक्षम स्तरावर तांत्रिक मान्यता घ्यावी असे निर्देश देण्यात आले आहेत. लाक्षणिक अनुदान प्राप्त झाल्यानंतर निविदा प्रक्रिया सुरु करण्याच्या दृष्टीने तांत्रिक मान्यता अंदाजपत्रक प्रचलित सन २०२२-२३ च्या जलसंपदा विभागाच्या दरसूचीनुसार अद्यावत किंमत ही प्रशासकीय मान्यता किंमती पेक्षा जास्त होत असल्याने तांत्रिक मान्यता न देता केवळ सन २०२२-२३ च्या दरसूचीनुसार अद्यावत करून तसेच गौण खनिज

स्वामित्व धनाचे सुधारीत दर,वस्तू व सेवा कर चे सुधारीत दर या कारणांमुळे वाढ झाल्याने प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रक मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून सादर करण्यात आले आहे.

योजनेचा पुनःप्रापित क्षेत्रानुसार प्रति हेक्टरी खर्च रु.१,७०,४५० /- इतका येत असून तो सध्याच्या प्रचलित आर्थिक मापदंड रु.२,८६,४१६ /- पेक्षा कमी आहे.

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून संदर्भाधीन पत्र क्र. २ अन्वये प्राप्त झालेला ओवळे खारभूमी योजना ता. व जि. ठाणे या खारभूमी योजनेच्या नूतनीकरणाच्या कामास प्रथमसुधारीतप्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

ओवळे खारभूमी योजना ता.व जि. ठाणे या योजनेच्या नूतनीकरणाच्या कामास जलसंपदा विभागाची दरसूची सन २०२२-२०२३ वर आधारित अंदाजित रू. ३२५.५५ लक्ष (रुपये तीनशे पंचवीस लक्ष पंचावन्न हजार फक्त) इतक्या रक्कमेस याव्दारे प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. तरतुदींचा उपशीर्षवार गोषवारा सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये देण्यात आला आहे. सदरील प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय -५, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद संधारण (०१) खार जमीन योजना (०१) बांधकामे (योजनांतर्गत ) (४४०२०३८४)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२) प्रस्तावित योजनेचा खर्च लेखाशिर्ष ४४०२ ०३८४ खाली उपलब्ध निधीमधून होणार असल्याने या लेखाशिर्षाखाली प्रगतीपथावरील योजनांचे दायित्व विचारात घेऊन योजना विहित कालावधीत व प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण होत असल्याची खातरजमा करण्यात यावी.

३) शासन शुध्दीपत्रक दिनांक १५.०१.२०२४ मधील अ.क्र. २ नुसार खारभूमी योजना पूर्ण करण्यासाठी पुनःप्रापित क्षेत्रातील लाभधारकांकडून प्रकल्पातील सहभाग म्हणून रुपये ५००/- प्रती हेक्टर खर्च (किमान रुपये २००/-रोख व रुपये ३००/- मजुरीच्या स्वरूपात किंवा रोखीने ) घेण्यात यावा. शासन निर्णय दिनांक ०४.०३.२०२२ मधील परिच्छेद क्र. २(३) नुसार खारभूमी योजनेचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी लाभधारकांनी सहकारी संस्था स्थापन करावी व योजनेचे काम पूर्ण झाल्यानंतर योजना देखभाल व दुरुस्तीसाठी त्यांच्याकडे हस्तांतरित करण्यात यावी.

४) सदर कामासाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पीय केल्याशिवाय त्यावर खर्च केला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

५) या कामाकरिता सर्व वैधानिक मान्यता घेतल्यानंतरच प्रत्यक्ष काम सुरु करावे.

६) सदर प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वित करण्याच्या विविध टप्प्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता असल्याचे गृहीत धरता येणार नाही. सदर प्रथम सुधारीत प्रशासकीय देण्यापूर्वी अथवा नंतरही या कामावर कोणतीही अनियमितता झालेली असल्यास अथवा आढळल्यास सदर प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान केल्याने ती नियमित झालेली आहे असे गृहीत धरता येणार नाही.

७) सदर प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. तसेच सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च न करण्याची जबाबदारी संपूर्णपणे प्रदेश कार्यालयाची राहील.

८) प्रचलित शासन निर्णय,नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक आहे व याची जबाबदारी संपूर्णपणे प्रदेश कार्यालयाची राहील.

९) सदर योजनेच्या प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यतेमध्ये अंतर्भूत किंमतीला तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी.

१०) संपूर्ण योजना ही प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावी.

सदरहू शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम भाग-२, दिनांक १७/०४/२०१५, भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७(२) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार आंतरवित्त सल्लागार व सह सचिव तसेच नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.६६/२०२३ (कार्यासन-१४३४), दिनांक १४/०३/२०२३ आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१४७/२०२३/व्यय १२, दि.२९/०३/२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता या विभागातील खारभूमी कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत १२ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०७११२३२२६४२७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**सहपत्र:- परिशिष्ट "अ"**

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2024.03.07 11:32:55 +05'30'

**( प्रविण कोल्हे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री, (जलसंपदा) महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री, (वित्त व नियोजन ) महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव, मुंबई.
५. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,१/२ मुंबई / नागपूर.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य,१/२ मुंबई / नागपूर..
९. महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर.
१०. जिल्हाधिकारी, ठाणे.
११. मुख्य अभियंता, (द व प्र) व सह सचिव यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई.
१३. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. उप सचिव (लघु पाटबंधारे) यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे.
१६. अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. अवर सचिव, अर्थ शाखा १/२,मंत्रालय, मुंबई.
१८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग/अर्थ-२,मंत्रालय, मुंबई.
१९. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन -१४३४) ,मंत्रालय, मुंबई.
२०. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्रमांक : खाभूयो २०२२ /प्र.क्र.१५६/खारभूमी
दिनांक : ०७/०३/२०२४ चे सहपत्र)

परिशिष्ट -"अ"

**ओवळे खारभूमी योजना ता. व जि. ठाणे, या योजनेच्या नुतनीकरण करणेच्या कामास प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतच्या प्रस्तावातील उपशीर्षनिहाय तरतूदी**

| अ.क्र. | उपशीर्ष | अंदाजपत्रकीय किंमत (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | अ- प्राथमिक कामे | ०.०० |
| २ | ब- भूमी संपादन | ०.०० |
| ३ | क- कामे बंधारा | १३३.५४ |
| ४ | फ- आर.एच.टी. वर्क | ८४.६५ |
| ५ | के- इमारती | २.५० |
| ६ | एम- वृक्षारोपण | ०.५० |
| ७ | ओ- संकीर्ण | ०.०६ |
| ८ | पी- देखभाल | ०.५५ |
| ९ | आर- दळणवळण | १४.५५ |
| | **एकूण कामे रुपये** | **२३६.३५** |
| | गौण खनिज स्वामित्व शुल्क | २०.६६ |
| | जी. एस. टी. (१८ %) | ४२.५४ |
| | कामगार विमा (१ %) | २.३६ |
| | अनुषांगिक खर्च (१० %) | २३.६४ |
| | **एकूण रुपये** | **३२५.५५** |

**ठळक वैशिष्टये**

| | |
|---|---|
| पुन:प्रापित होणारे क्षेत्र | १९१ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रुपये) | रुपये १,७०,४५० /- |
| लाभव्यय गुणोत्तर | २.४१ |

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2024.03.07 11:33:16 +05'30'

( प्रविण कोल्हे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन